**मौजे पळसवाडा, मौजे भापकी व मौजे हातुर्णा ता.वरुड जि.अमरावती या पुरग्रस्त पुनर्वसन वसाहतीमध्ये पुरवावयाच्या प्रशासकीय मान्यता प्राप्त नागरी सुविधांच्या कामांवरील खर्च भागविण्यासाठी पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेल्या तरतुदीच्या वितरणाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय :- क्रमांक :एफएलडी २०१६/प्र.क्र.९/र-१२.**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय ,मुंबई ४०००३२.
दिनांक : ५ जानेवारी, २०१७.

वाचा:-

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. जीटीएन :- १०८३/२१७/र-१२, दि.१०.२.१९८३
१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.एफएलडी ४६९५ /प्र.क्र.६०१/र-१२ दि.२१ एप्रिल, १९९५,
२) विभागीय आयुक्त,अमरावती विभाग यांचे पत्र क्र. उपाआ /उपले/पुनर्व/कावि/३६४/२०१५, दिनांक १८.१२.२०१५
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग,क्र.एफएलडी २०१६/प्र.क्र.९/र-१२, दि.१२ फेब्रुवारी,२०१६,
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. पूरक २०१६/प्र.क्र.१२८/अर्थसंकल्प-३,दि.१२.८.२०१६.
५) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक :- पूरक २०१६/प्र.क्र.११२/ब-१, दि. १६.०८.२०१६.

**प्रस्तावना :-**

मौजे पळसवाडा, भापकी व हातुर्णा ता. वरुड, जि.अमरावती या पूरग्रस्त पुनर्वसन वसाहतीमध्ये नागरी सुविधांच्या कामासाठी रु.३,९८,८०,६५५/- (रु. तीन कोटी अठ्ठयाण्णव लाख ऐंशी हजार सहाशे पंचावन्न फक्त) इतक्या सुधारित अंदाजपत्रकास संदर्भ क्र.४ येथील आदेशान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर कामासाठी संदर्भाधीन क्र.३ च्या प्रस्तावान्वये विभागीय आयुक्त, अमरावती यांनी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात रु.३,९८,८०,६५५/- इतक्या निधीची मागणी केली आहे. यासाठी जुलै,२०१६च्या पावसाळी अधिवेशनात मंजूर झालेल्या रु. ३,९८,८०,६५५/-(रुपये तीन कोटी अठ्ठयाण्णव लाख ऐंशी हजार सहाशे पंचावन्न फक्त) इतक्या पुरवणी मागणीची रक्कम अदा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

मौजे पळसवाडा, भापकी व हातुर्णा ता. वरुड, जि.अमरावती या पूर पुनर्वसित गावातील संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिलेल्या उर्वरित नागरी सुविधांच्या कामासाठी जुलै,२०१६ च्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेला रु. ३,९८,८०,६५५/-(रुपये तीन कोटी अठ्ठयाण्णव लाख ऐंशी हजार सहाशे पंचावन्न फक्त) इतका निधी विभागीय आयुक्त,अमरावती यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. सन २०१६-१७ या चालू वित्तीय वर्षामध्ये मागणी क्र.सी-६, मुख्य लेखाशीर्ष “२२४५,नैसर्गिक आपत्ती निवारणार्थ सहाय्य,०२, पूर, चक्रीवादळे, इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९२)(०४) पुरामुळे बाधित झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, पाणीपुरवठा, शाळा, चावडी, विद्युत पुरवठा, नागरी सुविधांवरील खर्च (२२४५ २२२९) योजनेतर ३१

सहाय्यक अनुदान वेतनेतर या लेखाशीर्षाखाली रु. ६,३५,६९,०००/- इतक्या रकमेची तरतुद पुरवणी मागणीव्दारे करण्यात आली आहे. या तरतुदीपैकी रु. ३,९८,८०,६५५/- (रु. तीन कोटी अठ्ठयावण लाख ऐंशी हजार सहाशे पंचावन्न फक्त) इतकी रक्कम पळसवाडा, भापकी व हातुर्णा ता. वरुड, जि.अमरावती या पूर पुनर्वसित गावातील उर्वरित नागरी सुविधांच्या कामासाठी या शासन निर्णयाव्दारे खालील अटींच्या अधीन राहून विभागीय आयुक्त, अमरावती यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहे. हा निधी अर्थसंकल्पिय प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे. विभागीय आयुक्त,अमरावती यांनी हा निधी जिल्हाधिकारी अमरावती यांना तात्काळ उपलब्ध करुन द्यावा.

<u>**अटी व शर्ती :-**</u>

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. जीटीएन - १०८३/२१७/र-१२, दि. १०.२.१९८३ मधील सर्व अटींचे पालन करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी ,अमरावती व संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील.

२) महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम विभाग कार्यनियमावलीतील प्रचलित नियमांनुसार सदर नागरी सुविधा कामांच्या अंदाजपत्रकांस संबंधित कार्यान्वयन यंत्रणेच्या अधिक्षक अभियंता / कार्यकारी अभियंता यांनी तांत्रिक मान्यता प्रदान केलेली असावी.

३) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामे यापूर्वी अन्य कोणत्याही योजनेतून करण्यात आलेली नाहीत. अथवा सदरची कामे अन्य योजनेत समाविष्ट नाहीत , तसेच या कामांवर यापूर्वी खर्च करण्यात आलेला नाही, याबाबात प्रकल्प यंत्रणेने खात्री केलेली असावी .

४) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांसाठीच्या अंदाजपत्रकांत दर्शविलेली कामनिहाय रक्कम तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेतील अटींचे विहीत कार्यपद्धतीनुसार पालन होईल, याची संबंधित कार्यान्वयन यंत्रणेच्या संबंधित अधिक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

५) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांवर होणारा खर्च मंजूर अंदाजपत्रकातील रकमेपेक्षा अधिक होणार नाही, याची संबंधित अधिक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी योग्य ती दक्षता घ्यावी.

६) नागरी सुविधा कामे करताना प्रस्तुत प्रस्तावित समाविष्ट असलेले गौण खनिज स्वामीत्वधनाची वसूली करण्याची जबाबदारी संबंधीत कार्यान्वयीन यंत्रणेची राहील.

७) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांचा उचित दर्जा राखला जाईल, याची संबंधित अधिक्षक अभियंता व संबंधीत कार्यकारी अभियंता यांनी योग्य ती दक्षता घ्यावी . वितरित करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

८) संबंधित कार्यकारी अभियंता यांनी प्रस्तावाधीन नागरी सुविधा सर्व दृष्टीने पूर्ण झाल्यावर जिल्हा परिषद, अमरावती यांच्याकडे सत्वर हस्तांतरित कराव्यात व तत्संबंधात जिल्हाधिकारी , अरावती यांचे मार्फत शासनाच्या पुनर्वसन विभागास अवगत करावे.

९) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, अमरावती यांनी प्रस्तुत नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, व त्याचा पूर्तता अहवाल शासन, विभागीय आयुक्त, अमरावती, जिल्हाधिकारी, अमरावती यांना सत्वर सादर करावा.

१०) मागणी क्र.सी-६, मुख्य लेखाशीर्ष "२२४५,नैसर्गिक आपत्ती निवारणार्थ सहाय्य,०२, पूर, चक्रीवादळे, इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९२)(०४) पुरामुळे बाधित झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, पाणीपुरवठा, शाळा, चावडी, विद्युत पुरवठा, नागरी सुविधांवरील खर्च (२२४५ २२२९) योजनेतर ३१ सहाय्यक अनुदान वेतनेतर या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचे संबंधित संनियंत्रण अधिकारी यांनी स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखापध्दतीनुसार महालेखापाल यांना सादर करावेत. तसेच या लेखाशिर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

११) या संदर्भातील खर्च विवरणपत्रे/अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधीसंबंधीत खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconciliation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

१२) संबंधित अधिक्षक अभियंता /कार्यकारी अभियंता यांनी नागरी सुविधा कामांची उपयोगिता प्रमाणपत्रे (Utility Certificate) महालेखापाल कार्यालय, संबधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/ शासनास सत्वर सादर करावीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०१०५१७४३२४३८१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shivaji P Karwar

Digitally signed by Shivaji P Karwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=46ec07554eac404147684ed8b27adc8a1c2a78fe8ffea3c9dd01377e25f76a36, cn=Shivaji P Karwar
Date: 2017.01.06 12:56:44 +05'30'

**(शि.पां.कारवार)**
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
३) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
४) उपसचिव तथा वित्तीय सल्लागार (मदत व पुनर्वसन) महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५) जिल्हाधिकारी, अमरावती
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती.
७) निवासी उप जिल्हाधिकारी , अमरावती
८) कार्यकारी अभियंता , सार्वजनिक बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, अमरावती
९) कक्ष अधिकारी, कार्यासन म-११, महसूल व वन विभाग , मंत्रालय, मुंबई-३२
१०) वित्त विभाग, कार्यासन क्र.व्यय-९, व्यय -१०, अर्थसंकल्प-३, ६, मंत्रालय, मुंबई-३२
११) कार्यासन अधिकारी ब-१, ब-२ महसूल व वन विभाग , मंत्रालय, मुंबई-३२
१२) निवड नस्ती, र-१२, महसूल व वन विभाग मंत्रालय, मुंबई-३२